अनुदान वाटप- २०१०-११
ग्रामपंचायत सार्वत्रिक/पोट
निवडणूका-२००५-०६, ते २०१०-११
वरील प्रलंबित खर्च भागविण्यासाठी
पूरक अनुदान

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक: ग्रापनि-२०१०/प्र.क्र.५१/पंरा-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २९ मार्च, २०११.

वाचा:- ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.ग्रापंनि-२०१०/प्र.क्र.५१/पंरा-२,
दि.२० एप्रिल २०१०, दि.३० एप्रिल २०१०, दि.१६ जून २०१०, दि.३० सप्टेंबर २०१०,
दि.२७ ऑक्टोबर २०१०, दि.४ डिसेंबर २०१० व दि.३१ डिसेंबर २०१०.

प्रस्तावना:-

ग्रामपंचायतींच्या सन २००५-०६ ते २०१०-११ या कालावधीत झालेल्या निवडणूकांच्या खर्चासाठी शासनाने जो निधी वितरित केला तो अपुरा असल्याचे नमूद करुन संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडून वाढीव निधीची मागणी सातत्याने राज्य निवडणूक आयोग त्याचप्रमाणे शासनाकडे करण्यात आलेली आहे. जिल्हाधिकाऱ्यांनी निवडणूक साहित्याची वाहतूक करण्यासाठी भाडेतत्वावर घेतलेल्या मार्ग परिवहन मंडळाच्या बसेस व अन्य खाजगी वाहनाची देयके, निवडणूक कर्तव्यार्थ नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्याचे भत्ते निधीच्या कमतरतेमुळे देणे शक्य झाले नसल्याने याबाबतची देयके प्रलंबित असल्याचे शासनास कळविले आहे. त्याशिवाय काही ठिकाणी निवडणूक साहित्याच्या पुरवठादारांना निधी अभावी देयके अदा करणे शक्य झाले नसल्याने पुरवठादाराकडून सातत्याने मागणी करण्यात येत आहे असेही जिल्हाधिकाऱ्यांनी शासनास कळविले आहे. शासनामार्फत प्रचलित निकषानुसार वाटप केलेल्या रक्कमेत निवडणूका घेणे खर्चातील वाढीमुळे शक्य होत नाही असे जिल्हाधिकारी यांनी निदर्शनास आणले असून राज्य निवडणूक आयोगानेही जिल्हाधिकाऱ्यांना प्रलंबित देयके भागविण्यासाठी वाढीव निधी मंजूर करणे गरजेचे आहे असे अभिप्राय दिले आहेत. या सर्व परिस्थितीत जिल्हाधिकाऱ्यांना सन २००५-०६ ते २०१०-११ या कालावधतील ग्रामपंचायत निवडणूकांचा प्रलंबित खर्च भागविण्यासाठी पूरक अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी "मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ जिल्हा आस्थापना-राज्यक्षेत्र (०४) (०१) (एक) - ग्रामपंचायतींच्या निवडणूका व (दोन) विभागीय ग्रामपंचायत मंडळ निवडणूका यासंबंधातील खर्च (२०५३ ०५४७) (योजनेत्तर) (राज्यक्षेत्र) (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली सन २०१०-११ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या एकूण रु.२०,२९ ,७०,०००/- (रुपये वीस कोटी एकोणतीस लक्ष सत्तर हजार फक्त) इतक्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांनी जाहीर केलेल्या सन २०१०-११ मधील ग्रामपंचायत सार्वत्रिक/पोट निवडणूका खर्च भागविण्याकरीता फेब्रुवारी,२०११ अखेर संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयांनुसार एकूण रु.१६,५६,५४,७६८/- (रुपये सोळा कोटी छप्पन लाख, चोपन्न हजार सातशे अडुसष्ठ फक्त) इतका निधी आतापावेतो संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे सुर्पूद करण्यात आला आहे.

आता, सन २०१०-११ मधील शिल्लक असलेल्या रु.३,७९,१५,२३२/- निधी मधून सन २००५-०६, ते २०१०-११ अखेरपर्यंतच्या ग्रामपंचायत निवडणूकांचा प्रलंबित निधी भागविण्यासाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार एकूण रु. ३,७९,१५,२३२/- (रुपये तीन कोटी एकोणऐंशी लाख पंधरा हजार दोनशे बत्तीस फक्त) इतका निधी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सुर्पूद करण्यात येत आहे.

(अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन आहे.

(ब) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे सन २००५-०६, ते २०१०-११ अखेरच्या ग्रामपंचायत निवडणूकांचा प्रलंबित निधी भागविण्यासाठीच वापरण्यात यावे.

(क) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही व कोणतीही अनियमितता घडणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(ड) या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची मासिक विवरणपत्रे जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्त व शासनाकडे प्रत्येक पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत, खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

(इ) अखर्चित राहिलेला निधी बी.डी.एस. द्वारे शासनास दि.३१ मार्च, २०१० पूर्वी प्रत्यार्पित करण्यात यावा. सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार (BDS) जिल्हाधिकारी यांचा युजर आयडी क्रमांक ०००९३०/उप जिल्हा निवडणूक अधिकारी युजर आयडी क्रमांक ०००९३४ /जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक युजर आयडी क्रमांक ०००९४८ (Head Clerk to the Collecter) यांच्या युजर आयडीवर वितरीत करण्यात येत आहे.

(ई) उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ जिल्हा आस्थापना-राज्यक्षेत्र (०४) (०१) (एक)- ग्राम पंचायतींच्या निवडणूका व (दोन) विभागीय ग्रामपंचायत मंडळ निवडणुका या संबंधातील खर्च (२०५३ ०५४७) (योजनेतर) (राज्यक्षेत्र) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३२९१९०५४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

२९।३।११

(गजानन दा. लाभे)
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन.

प्रत:-

१) विभागीय आयुक्त, (सर्व)
२) जिल्हाधिकारी, (सर्व)
३) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता। मुंबई, नागपूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर
५) जिल्हा लेखा कोषागार अधिकारी (सर्व)
६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.(दोन प्रती)
७) कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७ व वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
८) वित्त विभाग, (अर्थसंकल्प- ३, १६ व व्यय-१५), मंत्रालय, मुंबई.
९) उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) निवड नस्ती कार्यासन क्र.पंरा-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

<u>विवरणपत्र</u>

ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णयक्र: ग्रापंनि-२०१०/प्र.क्र.५१/पंरा-२, दि.२९ मार्च, २०११ चे सहपत्र.

(रुपये हजारात)

| अ. क्र. | जिल्हा | प्रलंबित वेतन | प्रलंबित कार्यालयीन खर्च | एकूण प्रलंबित निधी |
|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | ० | ३००.००० | ३००.००० |
| २ | रायगड | ० | ३३.७३२ | ३३.७३२ |
| ३ | रत्नागिरी | ० | ५३३.५०० | ५३३.५०० |
| ४ | नाशिक | ० | ९५.००० | ९५.००० |
| ५ | जळगांव | ३३२.६०० | २००.००० | ५३२.६०० |
| ६ | धुळे | ० | ५१०.००० | ५१०.००० |
| ७ | अहमदनगर | ० | २०००.००० | २०००.००० |
| ८ | पुणे | ० | ३०००.००० | ३०००.००० |
| ९ | सांगली | ० | ३०००.००० | ३०००.००० |
| १० | कोल्हापूर | ५०.००० | ४००८.००० | ४०५८.००० |
| ११ | औरंगाबाद | ० | ५४७.००० | ५४७.००० |
| १२ | उस्मानाबाद | ५०.००० | ५०५०.००० | ५६००.००० |
| १३ | लातूर | ० | २०००.००० | २०००.००० |
| १४ | जालना | ० | ३४०.००० | ३४०.००० |
| १५ | नांदेड | ० | १००.००० | १००.००० |
| १६ | अमरावती | ० | १०००.००० | १०००.००० |
| १७ | बुलढाणा | ० | १०००.००० | १०००.००० |
| १८ | अकोला | ० | १०१०.००० | १०१०.००० |
| १९ | वाशिम | ० | २०००.००० | २०००.००० |
| २० | यवतमाळ | ० | १०००.००० | १०००.००० |
| २१ | नागपूर | १९१.४०० | २०००.००० | २१९१.४०० |
| २२ | वर्धा | ० | ५००.००० | ५००.००० |
| २३ | चंद्रपूर | ० | २५००.००० | २५००.००० |
| २४ | भंडारा | ० | ५३९.००० | ५३९.००० |
| २५ | गोंदिया | ० | ४०००.००० | ४०००.००० |
| २६ | गडचिरोली | ० | २५.००० | २५.००० |
| **एकूण** | | ६२४.००० | ३७२९१.२३२ | ३७९१५.२३२ |

(रुपये तीन कोटी एकोणऐंशी लक्ष पंधरा हजार दोनशे बत्तीस फक्त)

(गजानन दा. लाभे)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन